GR-200404071419100001-0100

मंत्री आस्थापनेवरील अधिकारी /
कर्मचा-यांच्या नियुक्त्या करणेबाबत

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय परिपत्रक क्रमांक :- एमआयएन- २००१/१२१३/प्र.क्र.१०७/२१,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २ जून, २००१

परिपत्रक

मंत्री आस्थापनेवरील अधिकारी / कर्मचारी यांच्या नियुक्त्या ह्या मंत्री महोदयांच्या शिफारसीने करण्यात येतात. मंत्री महोदयांना कार्यक्षम अधिकारी / कर्मचारी उपलब्ध व्हावा या दृष्टीने अधिकारी / कर्मचा-यांच्या नियुक्त्या करताना संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचे सेवाविषयक अभिलेख तसेच त्यांच्या वर्तणूकीबाबत मंत्री महोदयांना माहिती असावी या हेतूने मंत्री महोदयांनी शिफारस केलेल्या अधिकारी /कर्मचा-यांचे गेल्या पाच वर्षांचे गोपनीय अहवाल तसेच त्यांच्या विरुध्द विभागीय चौकशी प्रलंबित अथवा विचाराधीन आहे, किंवा नाही याची प्रथम शहानिशा करुन घेण्यात यावी, त्याच प्रमाणे बाहेरील उमेदवार नेमतांना त्यांच्या चारित्र्याविषयी पोलिस अहवाल प्राप्त झाल्याशिवाय नेमणूक करण्यात येऊ नये, असा निर्णय घेण्यात आला आहे. प्रतिकुल बाबी असलेल्या अधिकारी / कर्मचा-यांच्या नियुक्त्या करण्यापूर्वी वस्तुस्थिती संबंधित मंत्री महोदयांच्या निदर्शनास आणून देण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(म. चिं. पाटील)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति.

१) सह सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
२) अवर सचिव (आस्थापना), मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
३) उप सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
४) खाजगी सचिव, सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
५) अवर सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग त्यांना विनंती करण्यात येत आहे की, सदरचे परिपत्रक त्यांच्या अधिपत्या खालील विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणण्यात यावे,
६) निवड नस्ती.